**लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील अपर पोलीस अधीक्षक, अमरावती हे पद नाशिक परिक्षेत्र येथे वर्ग करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
दुसरा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
**शासन निर्णय क्र:- H.D.-12020/4/2025-POL2-MHD-Home Department**
**दिनांक**:- २० फेब्रुवारी २०२५

**वाचा** :- १. शासन निर्णय, गृह विभाग, क्र.ओपीओ/११२२/प्र.क्र.१७७/पोल-३, दिनांक १०.१०.२०२३
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. संकिर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक ०२.०६.२०१५

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक ओपीओ/११२२/प्र.क्र.१७७/पोल-३, दिनांक १०.१०.२०२३ अन्वये निर्गमित झालेल्या आकृतीबंधानुसार लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य यांच्या घटक कार्यालयाच्या आस्थापनेवर घटकनिहाय अपर पोलीस अधीक्षक दर्जाच्या मंजूर १६ पदांना मान्यता देण्यात आलेली आहे.

०२. लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, अमरावती परिक्षेत्रामधील गुन्हयांची संख्या, ही नाशिक परिक्षेत्र येथे नोंदविलेल्या गुन्हयांच्या संख्येपेक्षा तुलनात्मकदृष्टया कमी आहे. ला.प्र.वि. नाशिक परिक्षेत्राचे नाशिक, अहमदनगर, धुळे, जळगाव, नंदुरबार असे विस्तृत कार्यक्षेत्र असून त्या परिक्षेत्रामध्ये शासकीय कार्यालयांची संख्या जास्त असून, सरकारी अधिकारी/कर्मचारी वर्ग मोठ्या प्रमाणात आहे. तसेच ला.प्र.वि. अमरावती परिक्षेत्र येथे नोंद झालेल्या गुन्हयांची संख्या कमी असून देखील त्याठिकाणी अपर पोलीस अधीक्षक दर्जाची दोन पदे मंजूर आहेत व ला.प्र.वि., नाशिक परिक्षेत्र येथे नोंद झालेल्या गुन्हयांची संख्या मोठ्या प्रमाणात असूनही त्याठिकाणी अपर पोलीस अधीक्षक दर्जाचे एकच पद मंजूर आहे.

०३. नाशिक परिक्षेत्रात लाचलुचपत संदर्भातील गुन्हयांची संख्या जास्त प्रमाणात असून अपर पोलीस अधीक्षक दर्जाच्या पदाची आवश्यकता असल्याने ला.प्र.वि., अमरावती परिक्षेत्र येथील अपर पोलीस अधीक्षक दर्जाचे एक पद ला.प्र.वि. नाशिक परिक्षेत्र येथील आस्थापनेअंतर्गत वर्ग होण्याबाबतची विनंती लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने शासनास केली आहे. त्यानुषंगाने, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, अमरावती परिक्षेत्र येथील अपर पोलीस अधीक्षक दर्जाचे एक पद लाचलुचपत

प्रतिबंधक विभाग, नाशिक परिक्षेत्र येथील आस्थापनेंतर्गत वर्ग करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

लाचलुचपत प्रतिबंधक विभागांतर्गत ला.प्र.वि., नाशिक व अमरावती परिक्षेत्रामध्ये नोंदविलेल्या गुन्हयांबाबतची माहिती तसेच लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, नाशिक परिक्षेत्रात लाचलुचपत संदर्भातील गुन्हयांची संख्या या बाबी विचारात घेवून, लाचलुचपत प्रतिबंधक विभागाअंतर्गत आकृतीबंधानुसार मंजूर असलेल्या अमरावती परिक्षेत्र येथील अपर पोलीस अधीक्षक दर्जाच्या दोन मंजूर पदापैकी एक पद लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, नाशिक परिक्षेत्र यांच्या आस्थापनेतंर्गत वर्ग करण्यास, याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक ०२.०६.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२०१३१८५८१६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH MADHAV BHAT

Digitally signed by VENKATESH MADHAV BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH MADHAV BHAT
Date: 2025.02.20 13:20:05 +05'30'

**(व्यंकटेश भट)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई.
२. पोलीस अधीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, अमरावती परिक्षेत्र, अमरावती.
३. पोलीस अधीक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, नाशिक परिक्षेत्र, नाशिक.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१ मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-२ /नागपूर.
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
७. सह सचिव/उप सचिव (पोल-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन पोल-२).